मराठी भाषा विभाग (खुद्द) साठी बाह्य यंत्रणेकडून १ वर्षासाठी वाहनचालक पुरविण्यासाठी करारनामा करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण/२०१७/प्र.क्र.५६/आस्था-१**
**८ वा मजला, नविन प्रशासन भवन,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक : ०१ जून,२०१७**

**संदर्भ-** १) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. पदनि २०१०/८४/वि,सु -१, दिनांक २७.९.२०१०.
२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.पदनि २०१३/क्र.क११/१३/विसु-१, दिनांक ०२ .०२.२०१३.
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. काआआ-२०१३ /प्र. क्र.२३३/कामगार-८, दिनांक १८.०६.२०१४

## शासन निर्णय

संदर्भ क्र. २ येथील वित्त विभागाच्या दि. ०२.०२.२०१३ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने ई-निविदा प्रक्रीयेचा अवलंब करून प्राप्त १० निविदांपैकी तांत्रिक व व्यावयायिक मुल्यांकनात व निविदामधील अटी/शर्तींची पूर्तता करणा-या दोन सेवा पुरवठादारांचे पॅनला संदर्भीय दिनांक १८/०६/२०१४ च्या शासन निर्णयान्वये तीन वर्षाकरिता मान्यता दिलेली आहे. सदर पॅनल कामगार आयुक्त यांच्या अखत्यारीतील कार्यालयांमधील पदे भरण्याबाबत तयार केलेले असले तरी, सदर पॅनल वरील सेवापुरवठादारांकडून मनुष्यबळ उपलब्ध करून घेण्याची मुभा शासनाच्या इतर विभागांना देण्यात आलेली आहे. मराठी भाषा विभाग (खुद्द) साठी वाहन चालकाचे पद कंत्राटपध्दतीने भरण्यासाठी पॅनलवरील २ सेवापुरवठादार कंपन्यांपैकी विभागाच्या मागणीपत्रास प्रतिसाद दिलेल्या मे.क्रिस्टल इंटीग्रेटेड सर्व्हिसेस प्रा.लि., मुंबई या कंपनीसोबत खालील अटी/शर्ती अंतर्भूत करून करारनामा करण्यात येत आहे.

## अटी व शर्ती

१. कंत्राटी कामाचा कालावधी शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक वर्षाच्या कालावधीसाठी लागू राहील. सदर कालावधीत कंत्राटदाराने मराठी भाषा विभागाच्या कार्यालयीन आवश्यकतेनुसार मागणी केलेले कंत्राटी कर्मचारी पुरविणे कंत्राटदारास बंधनकारक राहील.

२. वाहनचालक भारतीय नागरीक असावा, किमान चौथी इयत्ता उत्तीर्ण असावा. तसेच वाहनचालकास मराठी लिहिता वाचता व बोलता येणे आवश्यक आहे.

३. संस्थेतर्फे पुरविण्यात येणारा वाहनचालक गुन्हेगारी पार्श्वभूमीचा किंवा प्रवृत्तीचा नसावा.

४. वाहनचालकासोबत त्याचा वाहन चालविण्याचा परवाना, त्याचे ओळखपत्र (आधारकार्ड, निवडणूक कार्ड , पॅन कार्ड इत्यादीपैकी एक) त्याच्याजवळ असावे.

५. वाहनास अपघात झाल्यास व दुर्देवाने वाहन चालकास गंभीर स्वरुपात इजा झाल्यास वाहनचालकास वैद्यकीय खर्चाची अथवा नुकसान भरपाईचे कोणतेही दायित्व शासनाकडे असणार नाही. त्याची जबाबदारी संबंधीत संस्थेवर राहील.

६. कंपनी / संस्थेतर्फे काम करणा-या वाहनचालकाच्या सेवेचे कोणतेही उत्तर दायित्व शासनावर राहणार नाही.

७. वाहन चालकाचे वय ५८ वर्षापेक्षा जास्त आणि १८ वर्षापेक्षा कमी नसावे.

८. शासनाच्या आवश्यकतेनुसार वाहनचालकाची मागणी केली जाईल.

९. सदर कामासाठी उपलब्ध झालेल्या कंत्राटी कर्मचाऱ्यांकडून कार्यालयीन कामाच्या दिवशी कार्यालयीन वेळेत ९ तास प्रतिदिन प्रमाणे काम करावे लागेल. अधिक तास काम करावे लागल्यास अतिकालिक भत्ता देय होणार नाही.

१०. कंत्राटदाराकडून पुरविण्यात आलेल्या वाहन चालकाच्या वेतनापोटी कंत्राटदारास सर्व करांसहित मासिक ठोक रू.१८,३४८/- एवढी रक्कम अदा करण्यात येईल. तसेच

कामगार आयुक्त कार्यालयामार्फत दर सहा महिन्यांनी विशेष भत्ता अधिसूचनेव्दारे जाहीर केला जातो, त्यानुसार मराठी भाषा विभागाकडून उपलब्ध करून दिलेल्या विशेष भत्यासह सुधारीत वेतन देणे कंत्राटदाराला बंधनकारक राहील.

११.कराराचे पालन समाधानकारकपणे न झाल्यास करार केव्हाही संपुष्टात आणणे. तसेच कराराची मुदत वाढविणे याबाबतचा अंतिम निर्णय मराठी भाषा विभागाचा राहील.

१२.करारातील अटी व शर्ती मान्य असल्याबाबत व विहित वेळेत वाहन चालक पुरविण्याबाबत रूपये १००/- च्या स्टँप पेपरवर करारनामा करून देणे आवश्यक आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६०२११४२४८६८३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aparna Arvind Gawde

Digitally signed by Aparna Arvind Gawde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Marathi Language Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=240bdeb5a8c04b434248c583b5e7f565fb8f4397eae617484fa00c420b9d8820, cn=Aparna Arvind Gawde
Date: 2017.06.02 12:24:06 +05'30'

**(अपर्णा अ. गावडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र.-१,मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा) मुंबई.
३. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
४. अधीदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा/विनियम कार्यासन), मंत्रालय, मुंबई
६. कक्ष अधिकारी (रोखशाखा), मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. मे.क्रिस्टल इंटीग्रेटेड सर्व्हिसेस प्रा.लि.१५, क्रिस्टलहाऊस, डॉ. मनकीकर मार्ग, सायन (पू.), मुंबई-२२
८. निवड नस्ती/वैयक्तिक नस्ती